सन २००२-२००३ चे अर्थसंकल्पित झालेले
लेखाशीर्ष ३०५१-बंदरे व दीपगृहे
व लेखाशीर्ष ३०५६-अंतर्देशीय जलपरिवहन
(योजनांतर्गत) चे अनुदान महाराष्ट्र
मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. पीएलएन ०८/०१/प्र.क्र. २००/बंदरे-१,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : ३१ मार्च, २००३.

वाचा :- शासन निर्णय क्र. पीएलएन ०८/०१/प्र.क्र. २००/बंदरे-१,
दिनांक ३० नोव्हेंबर २००२.

**शासन निर्णय** :- शासन निर्णय गृह विभाग क्रमांक इपीटी-१०९६/प्र.क्र.१३३/परि-५, दिनांक २२ नोव्हेंबर, १९९६ अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाल्यामुळे बंदर संघटनेमार्फत कार्यान्वित होत असलेली योजनांतर्गत व योजनेतर कामे बोर्डामार्फत करण्यात येतात. याकरिता शासनाकडून बोर्डाला अनुदान, अर्थसंकल्प, कर्ज वगैरे देण्याची तरतूद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ७३ मध्ये आहे. सदर कलमाच्या तरतुदीनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान देणे शक्य व्हावे याकरिता शासन निर्णय, क्र. पीएलएन-०६९७/प्र.क्र. ४३/परि-४, दिनांक १५.०७.१९९७ अन्वये लेखाशीर्ष " ३०५१- बंदरे व दीपगृहे" व " ३०५६- अंतर्देशीय जलपरिवहन" या लेखाशीर्षाखाली (योजनेतर व योजनांतर्गत) उपशीर्ष सन १९९७-९८ या आर्थिक वर्षापासून उघडण्यास शासन मंजूरी देण्यात आली आहे.

२. शासन निर्णय गृह विभाग क्र. पीएलएन ०८/०१/प्र.क्र. २००/पीआरटी-१ दिनांक ३०.११.२००२ अन्वये सन २००२-२००३ या वर्षाकरीता पहिला हप्ता म्हणून एकूण रुपये ६,८५,३१,०००/- ( रुपये सहा कोटी पंच्याऐंशी लाख एकतीस हजार फक्त ) (योजनांतर्गत) इतके अनुदान महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्यात आले आहे.

३. सन २००२-२००३ चे वर्षाकरीता उर्वरित अनुदान मंजूर करण्यास वित्त विभागाने मान्यता दिल्यामुळे उर्वरित अनुदान रु.८,९८,९३,०००/- (आठ कोटी अठ्ठ्याण्णव लाख त्र्याण्णव हजार रुपये फक्त) एवढे अनुदान महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचेकडे खाली दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| प्रधान लेखाशीर्ष | शा. नि. दिनांक ३०.११.२००२ अन्वये मुक्त केलेले अनुदान | या शासन निर्णयान्वये मुक्त केलेले अनुदान | एकुण अनुदान |
|---|---|---|---|
| १. मागणी क्र. बी-७. ३०५१-बंदरे व दीपगृहे ०२, लहान बंदरे १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान (लहान बंदरे विकास) (योजनांतर्गत) (३०५१-०७-०३) | रु. ६,५५,३८,०००/- | रु. ८,६९;००,०००/- | रु. १५,२४,३८,०००/- |
| २. मागणी क्र. बी-३ ३०५६- अंतर्देशीय जलपरिवहन १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान (खाडी बंदरे विकास) (योजनांतर्गत) (३०५६-००-५५) | रु. २९,९३,०००/- | रु. २९,९३,०००/- | रु. ५९,८६,०००/- |
| एकूण | रु. ६,८५,३१,०००/- | रु. ८,९८,९३,०००/- | रु. १५,८४,२४,०००/- |

४. या शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या रक्कमेचा अधिदान व लेखा कार्यालयातील लेख्याशी खर्चमेळ करुन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ८८ अनुसार ताळेबंद तयार करुन कलम ८९ नुसार पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे अहवाल सादर करावा.

५. वरील तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे रहातील व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे नियंत्रक अधिकारी रहातील आणि महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग केलेली रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे संबंधित लेखाशीर्षाखाली रकमेची मागणी करतील.

६. आदेश वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सी.आर. ३९२/२००३, दिनांक २० मार्च, २००३, अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम एक कोटीपेक्षा जास्त असल्यामुळे वित्त विभाग परिपत्रक क्रमांक पी-५११/प्र.क्र.१४६/९१, अर्थोपाय, दिनांक १७.०५ १९९१ नुसार वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक सी.आर. ७५६/अर्थोपाय, दिनांक ३१.०३.२००३ अन्वये मुक्त करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुभाष बागवे

( सुभाष बागवे)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२, ((लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
प्रधान सचिव( परिवहन/बंदरे), गृह विभाग.
प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई. ( ५ जादा प्रतीसह)
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ ( व्यय-८ / अर्थ-११)
अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती.